**श्री.विठलराव जोशी चॅरीटीज ट्रस्ट संचलित भक्तश्रेष्ठ कमलाकरपंत लक्ष्मण वालावलकर ग्रामीण वैद्यकीय महाविद्यालय, सावर्डे, ता.चिपळूण,जि-रत्नागिरी यांस जिल्हा-रत्नागिरी येथील वहाळ, फुरुस, खरवते प्राथमिक आरोग्य केंद्राची संलग्नता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१४/प्रक्र-४८/आरोग्य ३(अ)**
गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, १० वा मजला,
ए विंग, नवीन मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: २५ जून,२०१५

**वाचा :-**

१) शासन निर्णय सा.आ.वि.क्रमांक:-एचएसजी १६९०/प्रक्र-९६/आरोग्य ३, दिनांक-३ ऑगस्ट,१९९०.
२) शासन निर्णय सा.आ.वि.क्रमांक:-संकीर्ण २०१३/प्रक्र-३०७/आरोग्य ३, दिनांक-३ ऑगस्ट,२०१३.
३) संचालक,आरोग्य सेवा,मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/राज्यस्तर/ग्रामीण अनुभव/प्रा.आ.केंद्र संलग्नीकरण/ वालवलकर/ग्रामीण वैद्यकीय महाविद्यालय/न.क्र-६७/कक्ष-३/टे-१/१४. दिनांक-३०.०१.२०१४.

**प्रस्तावना :-**

श्री.विठलराव जोशी चॅरीटीज ट्रस्ट संचलित भक्तश्रेष्ठ कमलाकरपंत लक्ष्मण वालावलकर ग्रामीण वैद्यकीय महाविद्यालय, सावर्डे, ता.चिपळूण,जि.रत्नागिरी या खाजगी वैद्यकीय महाविद्यालयास एम.बी.बी.एस अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांना कार्यानुभवाकरिता रत्नागिरी जिल्हयातील वहाळ, फुरुस व खरवते येथील प्राथमिक आरोग्य केंद्राची संलग्नता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त अनुक्रमांक-१ येथील शासन निर्णयास अनुसरुन आता या शासन निर्णयान्वये श्री.विठलराव जोशी चॅरीटीज ट्रस्ट संचलित भक्तश्रेष्ठ कमलाकरपंत लक्ष्मण वालावलकर ग्रामीण वैद्यकीय महाविद्यालय, सावर्डे, ता.चिपळूण,जि.रत्नागिरी या खाजगी वैद्यकीय महाविद्यालयास शैक्षणिक प्रयोजनार्थ रत्नागिरी जिल्हयातील वहाळ, फुरुस व खरवते येथील प्राथमिक आरोग्य केंद्रातील प्रत्येकी ६ खाटा संलग्नित करण्यास प्रतिदिन प्रतिखाट रुपये १५०/- इतक्या दराने खालील विहीत अटी व शर्तीच्या अधिन राहून पुढील ५ वर्षाकरिता वापरण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

१) खाटांसाठी आकारवयाचे शुल्क रुपये १५०/- प्रतिदिन प्रति खाटा प्रमाणे संस्था दर तिमाहीच्या पहिल्या महिन्याच्या पहिल्या आठवडयात, तीन महिन्याच्या कालावधीसाठी अग्रिम स्वरुपात चुकते करील. खाटा वापरण्याच्या कालावधीत शासन ठरविल ते सुधारित शुल्क त्या दिनांकापासून चुकते

करण्याचे संस्थेवर बंधनकारक राहिल. तसे न केल्यास ही संलग्नता रद्द करण्यात येईल व याबाबतचा शासनाचा निर्णय अंतिम राहील.

२) संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयासोबत जोडलेल्या करारपत्राच्या विहीत नमुन्याप्रमाणे संस्थेने उप संचालक, आरोग्य सेवा,मुंबई मंडळ, ठाणे यांचे समवेत करारपत्र करुन ते नोंदणीकृत करुन घ्यावे. या करारपत्रातील कोणत्याही अटीचे पालन न केल्यास किंवा अटीचा भंग झाल्यास ही संलग्नता रद्द करण्यात येईल व याबाबतचा शासनाचा निर्णय अंतिम राहील.

३) या संदर्भात सार्वजनिक आरोग्य व वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग हयांनी वेळोवेळी निर्देशीत केल्याप्रमाणे अन्य अटी व शर्तीचे पालन करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

४) वैद्यकीय अधिक्षक,जिल्हा रुग्णालय, रत्नागिरी यांनी विहीत अटी व शतीच्या अधिन राहून संबंधित संस्थेकडून करारपत्र तसेच प्रशासकीय बाबी पूर्ण करुन घ्याव्यात व नंतरच पुढील कालावधीसाठी खाटांचा वापर करण्यास परवानगी दयावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१५०६२५१३०१५२१०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shekhar Vasantrao Dhawale

Digitally signed by Shekhar Vasantrao Dhawale
DN: CN = Shekhar Vasantrao Dhawale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.25 13:20:55 +05'30'

(शेखर ढवळे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२. सहसंचालक, आरोग्य सेवा(रुग्णालये),मुंबई
३. सहसंचालक,आरोग्य सेवा (प्रा.आ.कें-राज्यस्तर), मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा(अर्थसंकल्प व प्रशासन),मुंबई
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे.
६. जिल्हा शल्य चिकीत्सक, रत्नागिरी.
७. श्री.विठलराव जोशी चॅरीटीज ट्रस्ट संचलित भक्तश्रेष्ठ कमलाकरपंत लक्ष्मण वालावलकर ग्रामीण वैद्यकीय महाविद्यालय, सावर्डे, ता.चिपळुण,जि.रत्नागिरी.
८. वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, नवीन मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती(आरोग्य ३अ)